महाजल कार्यक्रमांतर्गत सुधारीत
माळेगांव (बु.) ता. बारामती जि. पुणे
पाणी पुरवठा योजनेच्या अंदाजपत्रकास व
आराखडयास सुधारीत प्रशासकीय मान्यता

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,**
**शासन निर्णय क्र. पापुयो२००८/प्र. क्र. ३९३/पापु१७,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२. दिनांक :-३०.१०.२०१०**

**वाचा:-** १) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, ग्रापापु २१०३/प्र.क्र.१५४/पापु ०६, दि. ०७.०९.२००४

२) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, पुणे यांचे पत्र क्र. मु.अ. (पुणे)/तांशा- ३/छोटा गट/१६६४, दि. १.७.२००८

**प्रस्तावना:-**

वाढीव माळेगांव, ता. बारामती, जि. पुणे नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु.१३२६.४१ लक्ष (रुपये तेरा कोटी सव्वीस लक्ष एक्केचाळीस हजार फक्त) ढोबळ खर्चाच्या अंदाजपत्रकास संदर्भाधीन शासन निर्णयान्वये महाजल कार्यक्रमांतर्गत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. तथापि काही तांत्रिक बदलामुळे योजनेच्या खर्चात रु.९६३.०१ लक्ष इतकी वाढ झाली. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण पुणे यांच्याकडून प्राप्त झालेल्या सुधारीत वाढीव माळेगांव ता. बारामती, जि. पुणे योजनेला सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

प्रस्तावनेमध्ये नमुद केलेल्या बाबींस अनुसरुन सुधारीत वाढीव माळेगांव ता. बारामती, जि. पुणे या नळपाणी पुरवठा योजनेच्या रु.२२८९.४२ लक्ष ढोबळ(रुपये बावीस कोटी एकोणनव्वद लक्ष बेचाळीस हजार फक्त) रकमेच्या सुधारित अंदाजपत्रकास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत असून महाजल कार्यक्रमांतर्गत करावयाच्या तरतुदीचा तपशील या शासन निर्णयासोबतच्या सहपत्रात दर्शविण्यात आला आहे.

२. ही योजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत कार्यान्वित करण्यात येईल.

३. योजनेस खालील अटींच्या अधीन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. या योजनेच्या मुळ प्रशासकीय मंजुरी दिलेल्या शासन निर्णयात ज्या सूचना दिलेल्या आहेत, त्याचे काटेकोरपणे पालन करावे. तसेच मूळ शासन निर्णयात ज्या अटी व शर्ती दिल्या आहेत त्याचेही पालन करण्यांत यावे.
२. योजना विहित पध्दतीने पुर्ण करण्यात यावी.
३. सद्य:स्थितीत प्रस्तावित लोकवर्गणी पैकी रु.३८ लक्ष एवढी लोकवर्गणी ग्रामपंचायतीने भरली आहे. उर्वरित लोकवर्गणी ही संबंधीत ग्रामपंचायतीकडून वसूल करण्यात यावी.
४. पाणीपट्टी दरात वाढ करण्यात यावी.
५. प्रचलित धोरणानुसार मीटर पध्दती लागू करावी.

४. **<u>योजनेचा वित्तीय आकृतीबंध पुढील प्रमाणे राहील :</u>**

| | | |
|---|---|---|
| १) शासकीय अनुदान | (९०%) | रु. २०६०.४८ लक्ष |
| २) लोकवर्गणी | (१०%) | रु. २२८.९४ लक्ष |
| (रु. १९७.५५ लक्ष ईटीपी चार्जेस सह ढोबळ किंमत) | | रु. २२८९.४२ लक्ष |

५. या योजनेवर होणारा हा वाढीव खर्च मागणी क्र. वाय-२,२२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता ०१, पाणी पुरवठा १०२,ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम ( बी ) जिल्हा परिषदांना योजना अंतर्गत अनुदाने (०२) (०१) (डब्युएस-६) ( राज्य क्षेत्र) पाणी पुरवठा योजनांसाठी ग्रामपंचायती / जिल्हा परिषदांना अनुदाने (२२१५ १२१७)४१ सहायक अनुदाने या अर्थसंकल्पीय शिर्षाखाली केलेल्या तरतुदीतुन भागविण्यात यावा.

६. हा शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र. ४८२/व्यय ३, दिनांक २१.१०.२०१० अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या बेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक <u>*२०१०१०३०१८०८५३००१*</u> असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( र. सु. शेटये)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१.
२) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे
३) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, पुणे विभाग, पुणे.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे.
५) जिल्हाधिकारी, पुणे.
६) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, पुणे.
७) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग, पुणे
८) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा बांधकाम विभाग, पुणे.
९) संचालक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, पी.एम.टी.बिल्डींग स्वारगेट,पुणे.
१०)उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
११) वरिष्ठ भूवैज्ञाानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
१२) महालेखापाल,लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र २, नागपूर.
१३) महालेखापाल, लेखापरीक्षा , महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र २, नागपूर.
१४)प्रधान सचिव,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१५)मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय,मुंबई.
१६) मा.मंत्री,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.
१७) मा.राज्यमंत्री,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.
१८) कार्यासन क्र.पापु-०४,०५,०६,०८,०९,१०,१८पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
१९) संगणककक्ष, पाणीपुरवठाव स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
२०) निवडनस्ती कार्यासन पापु-१७.

------- xxxxxx -------

शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. पापुयो २००८/प्र.क्र. ३९३/पापु१७,
दि. ३०.१०.२०१० चे सहपत्र

| योजनेचे नाव | योजनेची मुळ मंजूर किंमत | | | योजनेची सुधारित किंमत | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | वर्धित वेग कार्यक्रमांतर्गत मंजूर तरतूद | किमान गरजा कार्यक्रमांतर्गत मंजूर तरतूद | एकूण | वर्धीतवेग कार्यक्रमांतर्गत सुधारित तरतूद | महाजल कार्यक्रमांतर्गत सुधारीत तरतूद | एकूण |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| सुधारीत माळेगांव (बु.) ता. बारामती जि. पुणे | ------- | १३२६.४१ लक्ष | १३२६.४१ लक्ष | ------- | २२८९.४२ लक्ष (वाढीव खर्च रु. ९६३.०१ लक्ष) | २२८९.४२ लक्ष |

( र. सु. शेटये)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन